सन २०२३ मध्ये पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या, सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखाली आरोग्य संस्था/कार्यालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी ३४४ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय, क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र.६३/आरोग्य ३अ**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २ मे, २०२४.

**वाचा :**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. मवैअ-२०२३/प्र.क्र.३०१/सेवा-३, दि. १९.०७.२०२३.

२) सह संचालक, (अर्थ व प्रशासवन) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/पी.जी.सेल/३४२ नवीन अधिसंख्य पदांचा प्रस्ता./३७/२०२४, दि. २९.०१.२०२४.

३) सह संचालक, (अर्थ व प्रशासवन) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/पी.जी.सेल/३४४नवीन अधिसंख्य पदांचा प्रस्ता./५३-६३/२०२४, दि. ०२.०२.२०२४.

४) सह संचालक, (अर्थ व प्रशासवन) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/पी.जी.सेल/३४४ नवीन अधिसंख्य पदांचा प्रस्ता./६४-६५/२०२४ दि. ०८.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य संस्था / कार्यालयांमध्ये कार्यरत वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी निवड झाल्यास त्यांना सदर अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी कार्यमुक्त करण्यात येऊन त्यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे शासनाचे धोरण आहे. ३४४ वैद्यकीय अधिकारी यांनी सन -२०२३ मध्ये नीट पीजी-२०२३ Sponsored DNB, एमडीएस-२०२३ व AIA-PGET-(Ayu) मार्फत दि. १ नोव्हेंबर, २०२३ पासून पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेला आहे. सदर प्रवेशित असलेल्या ३४४ वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य संस्था / कार्यालयातील सेवांतर्गत असलेले, ३४४ वैद्यकीय अधिकारी यांनी सन २०२३ मध्ये नीट पीजी-२०२३ Sponsored DNB, एमडीएस-२०२३ व AIA-PGET-(Ayu) अंतर्गत पदवी अभ्यासक्रमासाठी दि. १ नोव्हेंबर, २०२३ पासून प्रवेश घेतल्यामुळे सदर वैद्यकीय वैद्यकीय अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते काढण्याकरीता ३४४ अधिसंख्य पदे ३ (तीन) वर्षाच्या कालावधीसाठी दि. ०१.११.२०२३ ते ३१.१२.२०२६ (सबंधित अधिकाऱ्यांनी रजेच्या परिगणनेपोटी २ महिने जास्त दर्शविले आहेत.) या कालावधीसाठी निर्माण करण्यास, उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर वैद्यकीय अधिकारी यांच्यासाठी ३४४ अधिसंख्य पदे ३ (तीन) वर्षाच्या कालावधीसाठी

दि. ०१.११.२०२३ ते ३१.१२.२०२६ (सबंधित अधिकाऱ्यांनी रजेच्या परिगणनेपोटी २ महिने जास्त दर्शविले आहेत) या कालावधीसाठी निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेली ३४४ अधिसंख्ये पदे ही सबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांचे अभ्यासक्रम पूर्ण झाल्याच्या दिनांकानंतरच्या दिनांकास ०१.०१.२०२७ रोजी संपुष्टात येतील.

३. सदर पदावरील खर्च, मागणी क्रमांक:- आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(०४) गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) (०१) वेतन"या लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च हा त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५१/आपुक, दि. ०७.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा साकेतांक २०२४०५०२१४३००३५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.05.02 15:21:35 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) आरोग्य भवन, मुंबई
४. सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ
५. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. कक्ष अधिकारी वित्त विभाग /(आपुक कक्ष) मंत्रालय, मुंबई
८. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन-सेवा-२ व ३,/अर्थसंकल्प)
९. निवडनस्ती (आरोग्य-३).